**सोलार पॉवर प्रोजेक्ट, साक्री या प्रकल्पासाठी के.एफ.डब्ल्यु. जर्मन बँकेकडून महानिर्मिती कंपनी मर्यादित यांना प्राप्त झालेल्या कर्जाच्या वित्तीय वर्ष २०२१-२२ मधील रकमेच्या (७०.०१०१ कोटी) समायोजनाबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्र. पुरमा-२०२२/प्र.क्र.१८/ऊर्जा-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ३१ मार्च, २०२२

**संदर्भ :-** १) महालेखापाल कार्यालय, मुंबई यांचे पत्र क्र. D.O. No. ACII/CAORB/CH-१/२०२१-२२, दि. ०८.१२.२०२१.
२) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. १७.०३.२०२२

**प्रस्तावना** :-

सोलार पॉवर प्रोजेक्ट, साक्री प्रकल्प, के.एफ.डब्ल्यु. जर्मन बँकेच्या सहकार्याने उभारण्यात येत आहे. सदर प्रकल्पासाठी सन २०२१-२२ या वर्षाकरिता रक्कम रु. ०.०००१ कोटी मूळ तरतूद व माहे मार्च २०२२ च्या अधिवेशनामध्ये पुरवणी मागणीव्दारे (बाब क्र.२७) रक्कम रु. ७०.०१ कोटी इतकी तरतूद मंजूर करण्यात आलेली आहे. अशी एकूण रक्कम रु. ७०,०१,०१,०००/- तरतूद करण्यात आली आहे.

सन २०२१-२२ या वर्षाच्या खर्चाचे पूरक विवरणपत्र दि. ०३.०३.२०२२ रोजी विधानमंडळास सादर करण्यात आले. सदर पुरवणी खर्चास आता विधानसभेने मान्यता दिली आहे. दि. ३१.०३.२०२२ रोजी संपणाऱ्या वित्तीय वर्षाच्या विनियोजनांमध्ये समाविष्ट करण्यासाठी पुरवणी विनियोजन विधेयकास मा. राज्यपालांनी संमती दिली आहे. आणि ते महाराष्ट्र पुरवणी विनियोजन विधेयक, २०२२ (सन २०२२ चा महाराष्ट्र अधिनियम क्र. २३) म्हणून महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण, भाग-४, दि. १५.०३.२०२२ यामध्ये प्रसिध्द करण्यात आले आहे.

जागतिक बँकेकडून सन २०२१-२२ मध्ये कर्जरुपाने रु. ७०,०१,३५,०००/- इतकी रक्कम थेट प्रकल्प आस्थापित करणाऱ्या कंपनीस प्राप्त झालेली आहे. सदर रक्कम महालेखापाल कार्यालयाने ८६५८ ११० CAORB suspense या निलंबन लेखाशिर्षाखाली दर्शविले आहेत. हया रकमा दीर्घ कालावधीसाठी निलंबन खात्यामध्ये वर्ग करुन ठेवणे योग्य नसल्यामुळे त्या योग्य त्या लेखाशीर्षाखाली वर्ग करुन पुस्तकी समायोजन करण्याबाबत महालेखापाल कार्यालयाने सूचित केले आहे. याकारणास्तव रु. ७०,०१,३५,०००/- इतक्या रक्कमपैकी उपलब्ध रक्कम रु.७०,०१,०१,०००/- योग्य त्या लेखाशिर्षाखाली दर्शविण्यासाठी पुस्तकी समायोजन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

सोलार पॉवर प्रोजेक्ट, साक्री प्रकल्प, के.एफ.डब्ल्यु. जर्मन बँकेकडुन दि.०८.०१.२०२१ रोजी रक्कम रु.६६,६६,३१,०००/- व दि.२६.०८.२०२१ रोजी रक्कम रु.३,३५,०४,०००/- असे एकूण रक्कम रु.७०,०१,३५,०००/- आस्थापित करणाऱ्या कंपनीस थेट प्राप्त झाली आहे. तरी सदर रक्कमेपैकी रु. ७०,०१,०१,०००/- रक्कम समयोजनाने वितरीत करण्यास मंजूरी देण्यात येत आहे. तर उर्वरीत रु. ०.००३४ कोटी रक्कम पुढील आर्थिक वर्षात निधीच्या उपलब्धतेनुसार समायोजनाने वितरीत करण्यात येईल.

२. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाची रक्कम ज्या कारणासाठी मंजूर करण्यात आलेली आहे, त्याच कारणासाठी उपयोगात आणली जाईल याची खातरजमा करावी.

३. वरील बाबींचा खर्च "क्रमांक के-११, ६८०१ वीज प्रकल्पासाठी कर्जे, १९० सार्वजनिक क्षेत्र व इतर उपक्रमांना कर्ज, (००)(००)(०४) सौर ऊर्जा प्रकल्पासाठी के.एफ.डब्ल्यु. जर्मन बँकेकडुन महाराष्ट्र राज्य वीज निर्मिती कंपनीला कर्जे (कार्यक्रम) (६८०१०६६५), ५५ कर्जे व आगाऊ रकमा" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व तो सन २०२१-२२ या वित्तीय वर्षासाठी मंजूर असलेल्या तरतुदीमधून समायोजित करण्यात यावा.

४. सदर रकमेचे पुस्तकी समायोजन महालेखापाल मुंबई यांचे अखत्यारित व अधिकरारत करण्यात येत असल्याने या रकमेचे देयक तयार करण्यात येऊ नये.

५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा) महाराष्ट्र-१ यांनी त्यांच्या अखत्यारित व अधिकारात रु. ७०,०१,०१,०००/- इतक्या रक्कमचे पुस्तकी समायोजन करुन शासनास तसे कळवावे.

६. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ३९ / २२ / ऋवह, दि.२८.०३.२०२२ मधील मंजूरीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२२०४०६१२२५११२३१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NANASAHEB RAJARAM DHANE

Digitally signed by NANASAHEB RAJARAM DHANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a71698611123263cde9d32423e9bb73044d91ed0cffad3b6267198ee5014159f, pseudonym=5DD23ACB82750B55FAC0D076A47198885E07A4B6, serialNumber=6C39E2858150DBDFCFE6CD25ED08ADF59F4D2FD8C1EDE1730735F604904BF3BB, cn=NANASAHEB RAJARAM DHANE
Date: 2022.04.06 12:26:22 +05'30'

**( ना. रा. ढाणे )**

शासनाचे अवर सचिव

**प्रत:-**

१) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनी मर्यादित, प्रकाशगड, वांद्रे, (पूर्व), मुंबई - ४०० ०५१.
२) महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई-४०००२०.
३) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई-४०००२०.
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
५) अधिदान व लेखा अधिकारी, (अराप / रालेवि-१), मुंबई.
६) अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
७) निवासी लेखा अधिकारी, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०००५१.
८) अवर सचिव (रोख), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -४०००३२.
९) विशेष कार्य अधिकारी (ऊर्जा-५), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
१०) क.अ.अधिकारी (प्रशा-५), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -४०००३२.
११) वित्त विभाग, (अर्थसंकल्प-१३ / साधनसंपत्ती / साऊ / ऋवह/ व्यय-१६) मंत्रालय, मुंबई-३२.
१२) मुख्य विद्युत निरीक्षक, उद्योग,ऊर्जावकामगारविभाग,सार्वजनिक बांधकाम प्रशासकीय इमारत, कर मार्ग रामकृष्ण चेंबूर, ३ रा मजला, चेंबुर, (पूर्व), मुंबई-४०००७१.
१३) मुख्य अभियंता (विद्युत) जल विद्युत प्रकल्प, मुंबई -४००००१.
१४) कक्ष अधिकारी (ज.वि.) जल संपदा विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.